दि.६ जुलै, २००९ च्या शासन निर्णयान्वये
अकृषि विद्यापीठातील शिक्षकेतर पदांच्या
निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबंधानुसार
पदनिहाय मंजूरी देणे बाबत............
**गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र.जीयुजी २०११/(१०४/११)/विशि-१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १६ मे, २०११.

**वाचा :** (१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा,दि.१०.९.२००१.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असक-१००१/प्र.क्र.२९(भाग-६)/२००४/वित्तीय सुधारणा, दिनांक १.७.२००४.
(३) शासन निर्णय क्र.संकीर्ण २००७/(१२२/०७)/विशि-प्रशा, दिनांक ६ जुलै, २००९.
(४) शासन निर्णय क्र.जीयुपी २०१०/(६२२/१०)-विशि-१, दिनांक १० डिसेंबर, २०१०.
(५) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाचे क्र.रातुमनावि/कुस/आस्था/झो/११/२१७७, दि.२२-२-२०११ चे पत्र.
(६) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाचे क्र.रातुमनावि/कुस/आस्था/झो/११/२१७७, दि.०७-०५-२०११ चे पत्र.

**प्रस्तावना :-** वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयान्वये पदांचा आढावा घेऊन आकृतिबंध निश्चित करावे व आकृतिबंध अंतिम झाल्याशिवाय रिक्त पदे भरु नयेत असे सर्व प्रशासकीय विभांगाना आदेशित केले. वित्त विभागाच्या वरील निर्णयानुसार राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठाच्या शिक्षकीय व शिक्षकेतर पदांचा आढावा घेऊन आकृतिबंध निश्चित करण्याची कार्यवाही सुरु आहे. सदर प्रक्रियेला लागणारा विलंब लक्षात घेता शासनाने संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक १ जुलै, २००४ च्या शासन निर्णयान्वये मागासवर्गीय प्रवर्गांची ९०% व खुल्या प्रवर्गाची ५०% रिक्त पदे भरण्याची मुभा दिली. अशी सूट देऊनही अपुऱ्या मनुष्यबळामुळे विद्यापीठाच्या कामावर विपरीत परिणाम होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले. वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या निर्णयामुळे एका बाजुला सन २००१ रोजी अस्तित्वात असलेली रिक्त पदे भरता आली नाहीत, तर दुसऱ्या बाजुला सन २००१ नंतर वाढलेल्या कामासाठी आवश्यक पदांच्या बाबतीत सुध्दा निर्णय घेता आला नाही. दरम्यानच्या काळामध्ये मा.मुंबई उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठाने याचिका क्र.८०६७/२००६ मध्ये दि.०६-०४-२००९ रोजी व नागपूर खंडपीठ यांनी सुमोटो याचिका क्र.२२१६/२००६ मध्ये दि.३-१२-२००८ रोजी राज्यातील शिक्षणाची गुणवत्ता वाढविण्यासाठी राज्य शासनाने आवश्यक ती पावले उचलावीत व विद्यापीठाचा आकृतिबंध त्वरीत निश्चित करावा असे आदेशित केले. विद्यापीठातील अपुऱ्या मनुष्यबळामुळे शिक्षणावर होणारा संभाव्य दुष्परिणाम व मा.उच्च न्यायालयाचे वरील आदेश विचारात घेता, **संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक ६-७-२००९ च्या शासन निर्णयान्वये ९ अकृषि विद्यापीठांच्या शिक्षकेतर पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे.**

२.	सदर दि.६-७-२००९ च्या शासन निर्णयान्वये विद्यापीठांसाठी गटनिहाय पदे मंजूर करण्यात आली असून त्यामध्ये राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठासाठी एकूण ९४४ पदे मंजूर करण्यात आली होती. सदर ९४४ पदांची वर्गवारी गट-अ-६६, गट-ब-५६, गट-क-५२० आणि गट-ड-३०२ अशी आहे. तथापि, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठच्या कार्यकक्षेतील गडचिरोली व चंद्रपूर जिल्ह्यांसाठी स्वतंत्ररित्या गोंडवाना विद्यापीठ स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला असल्यामुळे राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठातील कांही पदे गोंडवाना विद्यापीठाकडे वर्ग करणे आवश्यक होते. त्यानुसार गडचिरोली व चंद्रपूर जिल्हा वगळता राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाच्या कार्यकक्षतील इतर जिल्ह्यातील विद्यार्थी संख्या विचारात घेऊन शासन निर्णय क्र.जीयुजी २०१०/(६२२/१०)-विशि-१, दिनांक १०-१२-२०१० अन्वये सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आला. त्यामध्ये गोंडवाना विद्यापीठासाठी एकूण १६० पदे मंजूर करण्यात आली आहेत. सदर १६० पदांची वर्गवारी गट-अ - ११, गट-ब - १०, गट क-८८ आणि गट ड-५१ अशी आहे.

२.१	संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयामधील परिच्छेद १४ मध्ये सदर विद्यापीठाने पदनिहाय सविस्तर प्रस्ताव सादर करावा असे सूचित करण्यात आले. त्यानुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाने संदर्भ क्र.५ येथील दिनांक २२ फेब्रुवारी, २०११ व संदर्भ क्र.६ येथील दि.७ मे, २०११ च्या पत्रान्वये सविस्तर पदनिहाय प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार सदर विद्यापीठाच्या शिक्षकेतर पदांच्या पदनिहाय आकृतीबंधासंदर्भात खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

## शासन निर्णय

३.	गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली या विद्यापीठासाठी संदर्भाधीन क्र.४ येथील दिनांक १०-१२-२०१० च्या शासन निर्णयान्वये एकूण १६० शिक्षकेतर पदांच्या आकृतीबंधास शासन मान्यता देण्यात आलेली आहे. **त्याचा पदनिहाय तपशील सोबतच्या प्रपत्र "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे मान्य करण्यात येत आहे.**

४.	तसेच सोबतच्या **प्रपत्र "ब "** मधील पदे राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाकडून गोंडवाना विद्यापीठाकडे वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५.	या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रातील रिक्त पदे संदर्भाधीन क्र.३ येथील दि.६-७-२००९ व संदर्भाधीन क्र.४ येथील १०-१२-२०१० च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून भरण्यात यावीत.

६.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २७०/०९ विसु-१ दि. २/५/२००९ अन्वये आणि उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०११०५१६१४०३१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

स्वाक्षरी/-
(विकास तु. कदम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर,
३) कुलगुरू, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली,
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
६) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
७) विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर.
८) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर,
९) कुलसचिव, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली,
१०) जिल्हा कोषाधिकारी, पुणे,
११) जिल्हा कोषाधिकारी, नागपूर,
१२) जिल्हा कोषाधिकारी, गडचिरोली,
१३) वित्त विभाग
१४) निवड नस्ती.

**(शासन निर्णय क्रमांक जीयुजी २०११/(१०४/११)-विशि-१, दिनांक १६ मे, २०११ चे सहपत्र)**

**प्रपत्र-अ**

**गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली या विद्यापीठासाठी आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेल्या शिक्षकेतर पदांचा पदनिहाय तपशील.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | ग्रेड वेतन | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| | | **गट- अ** | | |
| १ | उप कुलसचिव | १५६००-३९१०० | ६६०० | ०४ |
| २. | विद्यापीठ अभियंता | १५६००-३९१०० | ६६०० | ०१ |
| ३. | सिस्टीम / डाटाबेस ॲडमिनिस्ट्रेटर | १५६००-३९१०० | ६६०० | ०१ |
| ४. | सहायक कुलसचिव | ९३००-३४८०० | ५४०० | ०५ |
| | | | **एकूण.....** | **११** |
| | | **गट - ब** | | |
| ५. | स्वीय सहायक | ९३००-३४८०० | ४६०० | ०१ |
| ६. | अधिक्षक | ९३००-३४८०० | ४४०० | ०७ |
| ७. | असिस्टंट प्रोग्रॅमर | ९३००-३४८०० | ४४०० | ०२ |
| | | | **एकूण.....** | **१०** |
| | | **गट - क** | | |
| ८. | निवडश्रेणी लिपिक-नि-संगणक चालक | ९३००-३४८०० | ४३०० | १२ |
| ९. | उच्चश्रेणी लिपिक-नि-संगणक चालक | ५२००-२०२०० | २४०० | २० |
| १०. | निम्नश्रेणी लिपिक-नि-संगणक चालक | ५२००-२०२०० | १९०० | ३६ |
| ११. | वरिष्ठ लघुलेखक-नि-संगणक चालक | ९३००-३४८०० | ४४०० | ०३ |
| १२. | कनिष्ठ लघुलेखक-नि-संगणक चालक | ९३००-३४८०० | ४३०० | ०४ |
| १३. | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) | ९३००-३४८०० | ४४०० | ०३ |
| १४. | कनिष्ठ अभियंता (विद्युत) | ९३००-३४८०० | ४४०० | ०१ |
| १५. | वरिष्ठ वीजतंत्री | ५२००-२०२०० | २४०० | ०१ |
| १६. | कनिष्ठ वीजतंत्री | ५२००-२०२०० | २४०० | ०१ |
| १७. | वाहन चालक | ५२००-२०२०० | १९०० | ०६ |
| १८. | सांख्यिकी सहायक | ९३००-३४८०० | ४३०० | ०१ |
| | | | **एकूण.....** | **८८** |
| | | **गट-ड** | | |
| १९. | चौकीदार | ४४००-७४०० | १३०० | १० |
| २०. | फर्रास | ४४००-७४०० | १३०० | ५ |
| २१. | उद्यान रेजा | ४४००-७४०० | १३०० | १० |
| २२. | सफाईगार | ४४००-७४०० | १३०० | १६ |
| २३. | अभियांत्रिकी मजूर | ४४००-७४०० | १३०० | १० |
| | | | **एकूण.....** | **५१** |
| | | | **एकूण.(अ+ब+क+ड)** | **१६०** |

**(शासन निर्णय क्रमांक जीयुजी २०११/(१०४/११)-विशि-१, दिनांक १६ मे, २०११ चे सहपत्र)**

**प्रपत्र- ब**

**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाकडून वर्ग करण्यात आलेल्या पदांची यादी**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | ग्रेड वेतन | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १. | चौकीदार | ४४००-७४०० | १३०० | १० |
| २. | फर्रास | ४४००-७४०० | १३०० | ५ |
| ३. | उद्यान रेजा | ४४००-७४०० | १३०० | १० |
| ४. | सफाईगार | ४४००-७४०० | १३०० | १६ |
| ५. | अभियांत्रिकी मजूर | ४४००-७४०० | १३०० | १० |
| | | | **एकूण.....** | **५१** |